**अध्यक्ष, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, परभणी या पदावरील प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देणेबाबत...**
**श्री. शरद कुलकर्णी, उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः सकआ २०२१/प्र.क्र.२२५/आस्था-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०३ जुलै, २०२४.

**वाचा**- - १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक. एसारव्ही-२०११ / प्र.क्र.१३७ /कार्यासन-१२, दि.१७.१२.२०१६

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक. एसारव्ही-२०१६ / प्र.क्र.५१० /कार्यासन-१२, दि.१६.०२.२०१८

३)सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन आदेश क्रमांक सकआ-२०२१/प्र.क्र.२२५/आस्था-२, दि.२६.०७.२०२२

४) महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था ( बार्टी ), पुणे यांचे पत्र क्र.सीव्हीसी /कार्या१३(२) /श्री. कुलकर्णी प्र. नि. कालावधी /२०२३ /५४६२, दि.१८.१०.२०२३

**प्रस्तावना :-**

श्री. शरद कुलकर्णी, उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती यांची वाचा क्र. १ येथील शासन आदेशान्वये जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, परभणी या पदावर एक वर्षाकरीता प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार श्री. कुलकर्णी हे दि.०४.०८.२०२२ पासुन सदर पदावर कार्यरत होते. श्री. कुलकर्णी यांचा प्रतिनियुक्ती कालावधी दि.०४.०८.२०२३ रोजी संपुष्टात आला आहे. वाचा क्र.४ येथील पत्रान्वये महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था ( बार्टी ), पुणे यांनी श्री. कुलकर्णी यांच्या प्रतिनियुक्तीस २ वर्ष मुदवाढ़ देण्याची विनंती केली आहे. वाचा क्र.२ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्ती प्रथमत: ३ वर्षासाठी देण्याची तरतुद आहे. तसेच शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, दि.०२.०३.२०१५ अन्वये ३६ जिल्ह्यांकरीता ३६ जात प्रमाणपत्र पडताळणी समित्या स्थापन करण्यात आल्या आहेत. त्यानुसार सध्यस्थितीत जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांवरील अध्यक्षांची १४ पदे भरलेली असुन २२ पदे रिक्त आहेत. त्यामुळे श्री. कुलकर्णी यांना सदर पदावर देण्यात आलेल्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

श्री. शरद कुलकर्णी, उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती यांना शासन आदेश दि.२६.०७.२०२२ अन्वये अध्यक्ष, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, परभणी या पदावर देण्यात आलेल्या प्रतिनियुक्तीस दि.०५.०८.२०२३ पासून पुढील २ वर्षे इतक्या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. श्री. शरद कुलकर्णी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत शासन आदेश, दि.२६.०७.२०२२ मधील इतर सर्व अटी व शर्थी लागू राहतील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०३१८२६०६७९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH M KHAIRMODE

Digitally signed by SATISH M KHAIRMODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=a6351a2e14339ed095cda2a544af43de4b681afa9a5b92d3ad62ec4726ebebab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=79208454FA5609FCBFBE8A59A44EC2402F387AA627CD8748B6D2CFDDF68B76C6, cn=SATISH M KHAIRMODE
Date: 2024.07.03 18:36:57 +05'30'

**( सतीश खैरमोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. शरद कुलकर्णी, उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती सध्या अध्यक्ष, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, परभणी, (द्वारा- आयुक्त, समाज कल्याण, पुणे )

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री ग्रामविकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. विभागीय आयुक्त, अमरावती
५. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
६. आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे
७. महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था ( बार्टी ), पुणे
८. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपुर
९. अध्यक्ष जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, परभणी
१०.सर्व अतिरिक्त आयुक्त/सह आयुक्त/प्रादेशिक आयुक्त, समाज कल्याण
११.सचिव ( सा. न्या. ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२.सर्व सह सचिव/उपसचिव/अवर सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी
१४.निवडनस्ती